शासकीय सेवेत असतांना दिवंगत/ अकाली सेवानिवृत्त झालेल्या कर्मचाऱ्यांच्या नातेवाईकास अनुकंपा तत्वावर नियुक्ती देणे बाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय, क्रमांक अकंपा-१०९३/२३३५/प्र.क्र.९०/९३/आठ,
मंत्रालय, मुंबई - ३२. दिनांक :- १२ मार्च, १९९७

वाचा : शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.अकंपा-१०९३/२३३५/प्र.क्र.९०/९३, दिनांक २६ ऑक्टोबर, १९९४.

## शासन निर्णय

शासनाने अनुकंपा तत्वावर नियुक्ती देण्याच्या योजनेत सुधारणा करुन सुधारित योजना दिनांक २६ ऑक्टोबर, १९९४ च्या शासन निर्णयान्वये कार्यान्वित केली आहे. त्यानुसार नियुक्त्या करतांना काही ठिकाणी अशा रितीने नियुक्तींसाठी पात्र उमेदवारांची प्रतिक्षा यादी ठेवावी लागत असल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे. त्यामुळे अशा नियुक्त्यांस विलंब होऊन बरेच उमेदवार उच्च न्यायालय, लोकायुक्त यांचेकडे तातडीने नियुक्ती मिळावी यासाठी याचिका /निवेदने दाखल करीत असल्याचे आढळून आले आहे. या संदर्भात सखोल विचार करुन असा निर्णय घेण्यात आला आहे की, विभागात /कार्यालयात ठेवण्यात येणाऱ्या प्रतिक्षा सूचीनुसार अनुकंपा तत्वावर नियुक्ती देण्यास होणारा विलंब, जिल्हास्तरावर अशा उमेदवारांची संयुक्त यादी ठेवल्यास बराच कमी होईल. जिल्हास्तरावर विविध कार्यालयात उपलब्ध पदे यासाठी विचारात घेतली गेल्यास उमेदवारांना न्याय तत्वावर जागा उपलब्ध होऊ शकतील. या पार्श्वभूमीवर सदरील योजना राबविण्याबाबत वरील शासन निर्णयाच्या सोबत जोडण्यात आलेल्या परिशिष्ट "अ" मधील नियमावलीतील नियम ६ रद्द करण्यात येऊन खालीलप्रमाणे सुधारित नियम त्या जागी समाविष्ट करण्यात यावा.

नियम क्रमांक ६ : अ) प्रत्येक जिल्ह्यातील विभाग /कार्यालयात अनुकंपा तत्वावर नियुक्तीसाठी येणाऱ्या सर्व अर्जांची ज्येष्ठतेच्या दिनांकानुसार यादी जिल्हाधिकारी कार्यालयाने ठेवावी. तसे करताना गट क व गट ड मधील पदांसाठी स्वतंत्र यादी ठेवण्यात यावी.

ब) बृहन्मुंबईतील लोकसेवा आयोगाच्या कार्यकक्षेतील लिपिक वर्गीय पदांची यादी सामान्य प्रशासन विभागात संकलित करण्यात यावी. गट-ड मधील पदांबाबत संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी प्रचलित कार्यपध्दतीनुसार योग्य ती कार्यवाही करावी.

संबंधित विभागांनी /कार्यालयांनी त्यांच्या कार्यालयातील रिक्त पदे तसेच सेवाप्रवेश नियमानुसार, ही पदे भरण्यासंबंधातील तरतुदीनुसार वस्तुस्थितीबाबतची माहिती यथास्थिती सामान्य प्रशासन विभाग /जिल्हाधिकारी यांच्याकडे पाठवावी. तसे करताना ज्या कार्यालयातील कर्मचारी /अधिकारी यांचे पद ज्या [illegible]मुळे रिक्त होईल त्याचा तपशील तसेच या योजनेंतर्गत जो नातेवाईक यासाठी अर्ज करील त्याचा तपशील पाठवावा.

अशी माहिती संकलित करुन सामान्य प्रशासन विभाग /जिल्हाधिकारी यांनी त्यांच्या कार्यक्षेत्रातील उपलब्ध पदांवर ज्येष्ठतेनुसार नियुक्तीसाठी वाटप करण्याबाबतची कार्यवाही करावी.

सामान्य प्रशासन विभाग/जिल्हाधिकारी यांच्याकडून अनुकंपा तत्वावर नियुक्तीसाठी विभाग/कार्यालयात उपलब्ध असलेल्या पदांवर उमेदवारांचे वाटप केल्यानंतर सात दिवसांचे आत नियुक्ती करण्याची

जबाबदारी संबंधित नियुक्ती प्राधिका-याची राहील. तसे केल्याचे सामान्य प्रशासन विभाग/जिल्हाधिकारी यांना विनाविलंब कळविण्यात यावे.

क) सर्व कार्यालय विभाग प्रमुखांना त्यांच्या कार्यालयात/विभागात अनुकंपा तत्वावर नियुक्ती करता आलेल्या एकूण अर्जांची संख्या तसेच अनुकंपा तत्वावर नियुक्तीकरता संबंधित कार्यालयात/विभागात नियुक्ती केलेल्या उमेदवारांची माहिती सोबतच्या "क" विवरणपत्रात सामान्य प्रशासन विभाग व जिल्हाधिकारी यांचेकडे दर ६ महिन्यांनी पाठविणे बंधनकारक राहिल. या नियमानुसार असा ३१ डिसेंबर, १९९६ ची स्थिती दर्शविणारा सहामाही अहवाल ३१ मार्च, ९७ पर्यंत पाठवावा व यापुढील सहामाही अहवाल त्या त्या वर्षाच्या १५ जानेवारी, व १५ जुलै पर्यन्त पाठवावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

सही/-
(रवि भूषण बुधिदराजा)
सचिव (सेवा)
महाराष्ट्र शासन.

प्रति,
राज्यपालांचे सचिव, राजभवन मलबार हिल, मुंबई - ४०० ०३२.
मुख्य मंत्री यांचे सचिव.
सर्व मंत्री याचे खाजगी सचिव.
सर्व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक.
प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने)
प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने)
प्रबंधक, लोकआयुक्त व उप लोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई (पत्राने)
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (१० जादा प्रतींसह) (पत्राने)
सचिव, महाराष्ट्र विधानपरिषद सचिवालय, मुंबई. (पत्राने)
महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व हक्कदारी), मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा व परीक्षा), मुंबई.
महालेखापाल महाराष्ट्र-२ (लेखा व हक्कदारी), नागपूर.
महालेखापाल महाराष्ट्र-२ (लेखा व परीक्षा), नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
मुख्य लेखा परीक्षक (निवासी लेखे) कोकण भवन, नवी मुंबई.
सर्व विभागीय आयुक्त.
सर्व जिल्हाधिकारी.
सर्व जिल्हा परीषदांचे मुख्य कार्यकरी अधिकारी.
सामान्य प्रशासन विभाग /कार्यासन १२ व १४-अ.
सर्व मंत्रालयीन विभाग (सामान्य प्रशासन विभाग धरुन)
निरनिराळया मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख